<u>नियमित निवडसूची २०२२-२३:</u>

*“वरिष्ठ कार्यालय अधीक्षक” या पदावरुन “पोलीस महासंचालक यांचे उपसहायक, गट अ" या पदावर पदोन्नती देणेबाबत.*

# महाराष्ट्र शासन
## गृह विभाग
### शासन आदेश क्र. रापोसे-११२२/प्र.क्र.२२६/पोल-१अ.

मंत्रालय, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई. पिन-४०००३२.
दिनांक : ०६ एप्रिल, २०२३.

<u>संदर्भ</u> :-
१) शा.नि., सा.प्र. विभाग, क्र.एसआरव्ही-२०१८/ प्र.क्र.१५९/ कार्या.-१२, दिनांक ०१.०८.२०१९.
२) शा.नि., सा.प्र. विभाग, क्र.बीसीसी-२०१८/ प्र.क्र.३६६/१६-ब, दिनांक ०७.०५.२०२१.
३) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, यांच्या कार्यालयाचे पत्र पोमसं/८/५/६८०/पदोन्नती/(उपसहायक २०२२-२३)/१२७/२०२२, दिनांक १३.१२.२०२२

<u>शासन आदेश</u>.

पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, यांच्या आस्थापनेवरील “शहर लिपिक" संवर्गातील, “पोलीस महासंचालक यांचे उपसहायक, गट अ” या पदावर पदोन्नती देण्याकरिता तयार करण्यात आलेल्या “वरिष्ठ कार्यालय अधीक्षक” यांची “<u>नियमित निवडसूची २०२२-२३</u>” यामध्ये समाविष्ट असलेल्या, पुढील तक्त्यातील स्तंभ (२) मध्ये नमूद अधिका-यांना, “पोलीस महासंचालक यांचे उपसहायक, गट अ” या पदावर, सेवाज्येष्ठतेनुसार, तात्पुरत्या स्वरुपात, पुढील अटींवर, याद्वारे, पदोन्नती देण्यात येत आहे-

| <u>अ.क्र.</u> (१) | <u>अधिका-याचे नाव</u> (२) |
|---|---|
| १. | श्री. प्रवीण मधुकर शिखरे |
| २. | श्री. महेंद्र बाळकृष्ण पेडणेकर |
| ३. | श्री. विनय श्रीपत राणे |
| ४. | श्रीम. संजिवनी नरेंद्र भोसले |
| ५. | श्री. एकनाथ जिजाबा मोहिते |

अटी:-

१) उक्त पदोन्नती ही विशेष अनुमती याचिका क्र.२८३०६/२०१७ या प्रकरणात मा.सर्वोच्च न्यायालयाच्या न्यायनिर्णय व आदेश यांच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

२) उक्त पदोन्नती ही शा.नि., सा.प्र. विभाग, क्र.बीसीसी-२०१८/प्र.क्र.३६६/१६-ब, दिनांक ०७.०५.२०२१, यास आव्हान देण्यात आलेल्या प्रकरणात मा.मुंबई उच्च न्यायालयाच्या न्यायनिर्णयाच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

३) उक्त पदोन्नती ही निव्वळ तात्पुरत्या स्वरुपाची असल्याने या तात्पुरत्या पदोन्नतीमुळे संबंधित अधिकारी यांना नियमाधीनतेचा *(regularization)* व सेवाज्येष्ठतेचा *(seniority)* कोणताही हक्क असणार नाही.

२. त्या अनुसार, पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, यांनी पुढील उचित कार्यवाही करावी.

३. हा शासन आदेश, सामान्य प्रशासन विभागाच्या मान्यतेने *[अनौपचारिक संदर्भ क्र.७९/२०२३/का.-१२, दिनांक ३१.०१.२०२३]* निर्गमित करण्यात येत आहे.

४. हा शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०४०६१९४१५९९६२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SWAPNIL GOPAL BORSE

Digitally signed by SWAPNIL GOPAL BORSE
DN: CN = SWAPNIL GOPAL BORSE, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = HOME DEPARTMENT
Date: 2023.04.06 19:54:52 +05'30'

**(स्वप्निल गोपाल बोरसे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) मा. उप मुख्यमंत्री, गृह, यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) पोलीस महासंचालक व महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

**प्रत-**

१) प्रधान महालेखापाल (लेखा व हकदारी/ लेखा परीक्षा)-१/२, महाराष्ट्र, मुंबई/ नागपूर.
२) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
३) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
४) संबंधित अधिकारी *(पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, यांच्यामार्फत).*
५) निवड फाईल, पोल-१अ.